जिल्हा नियोजन समिती, नागपूर या
समितीवर विशेष निमंत्रित सदस्यांची
नियुक्ती करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: डिएपी-२०२२/प्र.क्र.७९/का-१४८१-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०५ जुलै, २०२३.

पहा:- १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८,
२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम २०००
३) समक्रमांकित शासन निर्णय दि.२४.११.२०२२.

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, क्रमांक ३०/२०००" मधील कलम ३ चा पोटकलम (३)(दोन) (ब) व ३(३)दोन (क)नुसार व पोटकलम (३) मधील (चार) (फ) येथिल तरतूदीनुसार विधीमंडळ/संसद सदस्यांमधून नामनिर्देशनाच्या २ सदस्यांची, तसेच जिल्हा नियोजनाचा अनुभव असलेल्या २ सदस्यांची व सामान्यपणे जिल्हा नियोजन समितीच्या क्षेत्रातील निवासी असलेल्या १४ व्यक्तिंची "विशेष निमंत्रित" म्हणून नागपूर जिल्ह्याच्या जिल्हा नियोजन समितीवर संदर्भाकित शासन निर्णय क्र.३ अन्वये नियुक्ती करण्यात आली होती. सदर १४ "विशेष निमंत्रित" व्यक्तींपैकी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे **२ सदस्यांची नियुक्ती रद्द** करण्यात येत असून त्यांचे जागी **२ नवीन सदस्यांची नियुक्ती** करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| नियुक्ती रद्द करण्यात येत असलेले सदस्य | | | नवनियुक्त सदस्य | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | सदस्याचे नाव | पत्ता | सदस्याचे नाव | पत्ता |
| १ | श्री.संदीप सरोदे | मेन रोड, दोडकीपुरा, काटोल, पिन नं. ४४१३०२ | श्री. हर्षवर्धन निकोसे | रा.डोरली, ता. पारशिवनी, जि. नागपूर |
| २ | श्री.रुपराव शिंगणे | रा.पेवठा, पो.रुही, ता. जि. नागपूर | सौ.शांता कुंभरे | रा. बेलदा, ता. रामटेक, जि. नागपूर |

२. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, **नागपूर** यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

३. **नागपूर** जिल्हा नियोजन समितीवर वरील नमूद नामनिर्देशित तसेच विशेष निमंत्रित यांच्या करण्यात आलेल्या नियुक्त्या पुढील आदेश होईपर्यंत किंवा शासनाकडून सदर नियुक्त्या रद्द होईपर्यंत या पैकी जे अगोदर घडेल, तो पर्यंत अबाधित राहतील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७०५१२१०५०२६१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANJEEV
HARISHCHANDRA DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2023.07.05 12:12:49 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. पालकमंत्री तथा अध्यक्ष, जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर,
७. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नागपूर.
८. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
११. कोषागार अधिकारी, नागपूर.
१२. निवड नस्ती, का-१४८१ अ, नियोजन विभाग.